**प्रशासकीय मान्यता**

**केंद्र शासनाकडून स्थापन करण्यात आलेल्या महादई पाणी तंटा लवादाच्या कामकाजासाठी होणाऱ्या संभाव्य खर्चाचे अंदाजपत्रक – प्रशासकीय मान्यता**

**महाराष्ट्र शासन,**
**जलसंपदा विभाग,**

शासन निर्णय क्रमांक - मांडवी – २०१०/प्र.क्र.३२७/१०/जसंनि
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई – ४०००३२.
दिनांक - ०८ /११/२०११

संदर्भ :- १) कार्यकारी संचालक, कोकण पाटबंधारे विकास महामंडळ, ठाणे यांचे पत्र क्रमांक- कोपाविम/तां.२/मांडवी लवाद/ ५१०९/सन २०१० दि. ७/१२/२०१०

२) कार्यकारी संचालक, कोकण पाटबंधारे विकास महामंडळ, ठाणे यांचे पत्र क्रमांक- कोपाविम/तां.२/महादयी खोरे/३६२/सन २०११ दि. २८/१/२०११

**प्रस्तावना :-**

मांडवी नदी कर्नाटक व गोवा या राज्यातून वाहणारी पश्चिम वाहिनी नदी असून या नदीचे काही जलग्रहण क्षेत्र महाराष्ट्र राज्यात येते. या मांडवी नदीच्या खो-यामध्ये कर्नाटक शासनाने प्रस्तावित केलेल्या प्रकल्पांविरुध्द गोवा शासनाने सर्वोच्च न्यायालयात दावा क्र.४/०६ दाखल केला होता. सदर दाव्याच्या अनुषंगाने सर्वोच्च न्यायालयाने दिलेल्या आदेशानुसार केंद्र शासनाच्या जलसंसाधन मंत्रालयाने दि.६.११.२०१० च्या अधिसूचनेद्वारे ‘महादई जलविवाद अभिकरण‘ गठीत केले आहे.

या लवादाचे काम पाहण्यासाठी व महाराष्ट्र राज्याची भूमिका सुयोग्यरित्या आणि प्रभावीपणे मांडण्यासाठी महादई पाणी तंटा लवाद विशेष कक्ष उभारण्याचा निर्णय शासनाने घेतलेला आहे. या लवाद कक्षाच्या खर्चाचे तसेच तांत्रिक सल्लागार, वकील यांच्यासाठी होणाऱ्या

संभाव्य खर्चाचे अंदाजपत्रक कार्यकारी संचालक, कोकण पाटबंधारे विकास महामंडळ, ठाणे यांनी शासनास प्रशासकीय मान्यतेसाठी सादर केले होते. सदर अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्याचे शासनाच्या विचाराधीन होते. .

**शासन निर्णय :-**

महादई पाणी तंटा लवादासमोर महाराष्ट्र राज्याची सिंचन विषयक पाण्याच्या मागणी संदर्भातील बाजू आणि या संदर्भातील राज्याचा दावा अधिक प्रकर्षाने, सुसंगतपणे, परिणामकारकपणे व अभ्यासपूर्वक पद्धतीने माडण्यासाठी व इतर निगडीत बाबींवरील रू. ८३१.२९ लक्ष ( रुपये आठ कोटी एकतीस लक्ष एकोणतीस हजार मात्र) खर्चाच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे. अंदाजपत्रकाचा गोषवारा सोबत जोडला आहे.

यासाठी होणारा खर्च “ ४७०१, मोठे व मध्यम प्रकल्प – योजनेतर” या मुख्य लेखाशिर्षाखाली टाकावा.

निधी उपलब्ध झाल्याशिवाय सदर कामास सुरुवात करण्यात येऊ नये.

हा निर्णय दि. ५/१०/२०११ रोजी झालेल्या मंत्रिमंडळ बैठकीत जलसंपदा विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकाराचा वापर करून निर्गमीत करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संगणक सांकेतांक २०११११०८१६०१०८००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

(सु. रा. बावस्कर)
शासनाचे उप सचिव

प्रत,
महालेखापाल ( लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १ व २, मुंबई / नागपूर.
महालेखापाल (लेखापरिक्षा) महाराष्ट्र १ व २, मुंबई/ नागपूर.
वित्त विभाग (व्यय ), मंत्रालय, मुंबई.

नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
प्रधान सचिव (जलसंपदा), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
सचिव (लाक्षेवि), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
कार्यकारी संचालक कोंकण पाटबंधारे विकास महामंडळ, ठाणे
सर्व मुख्य अभियंता व सह सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
सह सचिव (सेवा), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
मुख्य अभियंता, जलसंपदा कोंकण प्रदेश, मुंबई.
मुख्य अभियंता, जलविज्ञान प्रकल्प, नाशिक
सर्व अधीक्षक अभियंता व पदसिद्ध उप सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
अधिक्षक अभियंता, कोंकण पाटबंधारे मंडळ, रत्नागिरी.( ५ जादा प्रती)
कार्यकारी अभियता, पाटबंधारे प्रकल्प, बांधकाम विभाग, रत्नागिरी.
कार्यासन अधिकारी (कार्यासन अर्थ-१/ अर्थ-२/ आ (प्रशि)/ आ-वर्ग-२/ आ (शा.अ.)/ आ( तां)/ आ (अ.तां.)), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
कार्यासन (जसंनि) संग्रहार्थ.

शासन निर्णय क्रमांक - मांडवी – २०१०/प्र.क्र.३२७/१०/जसंनि दिनांक ०८/११/२०११ चे सहपत्र

# Estimate for Special Unit of Mahadayi Water Dispute Tribunal

## RECAPULATION SHEET

(Rs. in lakhs)

| Sr. No. | Name of sub estimate | Total amount of Sub Estimate |
|---|---|---|
| 1 | Sub estimate no-1<br>Providing computer & Telecommunication system at Delhi / Thane | 16.90 |
| 2 | Sub estimate no-2<br>Providing vehical arrangments at Delhi / Thane | 15.12 |
| 3 | Sub estimate no-3<br>Providing stationary for Delhi / Thane office. | 12.28 |
| 4 | Sub estimate no-4<br>Providing charges to Technical Consultant, Counsel's & Advocate's Fee & their Travelling etc. | 700.00 |
| 5 | Sub estimate no-5<br>Providing maintenance charges of KG Rest House @ Delhi. | 20.46 |
| 6 | Sub estimate no-6<br>Miscellaneous | 8.26 |
| 7 | Sub estimate no-7<br>Charges of Technical Consultant, Counsel's & Advocate's Fee & their Travelling etc in respect of Original Suit No. 4/2006 in Supreme Court upto 12/2010 | 18.68 |
| | **Total** | **791.70** |
| | Add for incidential and unforeseen charges 5% | 39.59 |
| | **GROSS TOTAL** | **831.29** |